महसूल व वन विभागांतर्गत महसूल
उपकक्षातील कार्यासनांची पुनर्रचना.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ओएफएम १०/२०१४/प्र.क्र.५३/ई,**
३२ वा मजला, सेंटर-१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई : ४०० ००५.
दिनांक: २७ ऑगस्ट, २०१४.

**संदर्भ :- शासन निर्णय, म. व व.विभाग समक्रमांक दि.२१ सप्टेंबर, २०१२.**

**शासन निर्णय :-**

दिनांक २१ जून, २०१२ रोजी मंत्रालयात लागलेल्या भीषण आगीमध्ये महसूल व वन विभागांतर्गत महसूल उपकक्षातील म-५, म-१०, ल-१, ल-६, ल-७, ई-६, ई-९ व ख ही कार्यासने वगळता उर्वरित सर्व कार्यासने (आस्थापना व रोख कार्यासनासहित) आगीच्या भक्ष्यस्थानी पडली आहेत.

०२. सदर आगीनंतर महसूल उपकक्षातील कार्यासनांची दि. २१ सप्टेंबर, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये पुनर्रचना करण्यात आली आहे. या पुनर्रचनेमुळे प्रामुख्याने महसूल उपविभागातील जमीन विषयक कार्यासनांतील बहुतांश कार्यासनांचे सुसूत्रीकरण झाले असून कामाचा निपटारा जलदगतीने होण्यास व प्रशासन लोकाभिमुख होण्यास मदत झाली आहे.

०३. या पुनर्रचनेनंतर असे निदर्शनास आले आहे की, महसूल उपकक्षात “ ल ” गटातील दोन कार्यासनांतील कामाचे फेरवाटप होणे जरुरीचे आहे. यापैकी ल-४ कार्यासनाकडे “ वेगवेगळया इनामविषयक कायद्यांची अंमलबजावणी व तदानुषंगिक अर्धन्यायिक व न्यायालयीन प्रकरणे ” हे कामकाज सोपविलेले आहे. त्याचप्रमाणे ल-९ कार्यासनाकडे प्रामुख्याने आदिवासी व्यक्तींच्या जमिनी बिगर आदिवासी व्यक्तींना होणा-या हस्तांतरणासंबंधीचे कामकाज (अर्धन्यायिक व न्यायालयीन प्रकरणांसह ) सोपविलेले आहे.

या दोन्ही कार्यासनांतील कामाचे वाटप “ ज ” गटातील कार्यासनांमध्ये करण्याचा प्रस्ताव शासनाकडे काही काळ विचाराधीन होता.

०४. शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, उपरोक्त ल-४ व ल-९ ही महसूल उपकक्षातील दोन कार्यासने तात्काळ व्यपगत करण्यात यावीत. या दोन्ही कार्यासनांऐवजी पुढे दर्शविलेली नवीन दोन कार्यासने निर्माण करण्यात येत आहेत. ल-४ व ल-९ या दोन्ही कार्यासनांकडे असलेली प्रकरणे " ज " गटातील कार्यासनांकडे , त्यांच्या भौगोलिक क्षेत्रानुसार वर्ग करण्यात यावीत. तसेच या दोन्ही कार्यासनांकडील धोरणात्मक बाबी सद्य:स्थितीत ज-१ कार्यासनाकडे सोपविण्यात याव्यात.

०५. वरील निर्णयाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने आता खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत:-

अ) कक्ष अधिकारी, ल-४ यांनी त्यांच्याकडे असलेली प्रकरणे (अपिल अर्ज/पुनरिक्षण अर्ज/पुनर्विलोकन अर्जांसह) व तदानुषंगिक न्यायालयीन प्रकरणे भौगोलिक क्षेत्रानुसार " ज " गटातील संबंधित कार्यासनांकडे तात्काळ वर्ग करावीत.

ब) ल-४ कार्यासनाकडील "नांदेड शिख गुरुद्वारा सचखंड श्रीहुजूर अवचलनगर साहेब अधिनियम,१९५६" हा विषय ज-७(अ) या कार्यासनाकडे सोपविण्यात येत असून, या विषयाशी संबंधित सर्व प्रकरणे कक्ष अधिकारी, ल-४ यांनी तात्काळ ज-७(अ) या कार्यासनाकडे वर्ग करावीत.

क) कक्ष अधिकारी, ल-९ यांनी त्यांच्याकडे असलेली प्रकरणे (अपिल अर्ज/पुनरिक्षण अर्ज/पुनर्विलोकन अर्जांसह) तदानुषंगिक न्यायालयीन प्रकरणे, भौगोलिक क्षेत्रानुसार " ज " गटातील संबंधित कार्यासनांकडे तात्काळ वर्ग करावीत.

ड) कक्ष अधिकारी, ल-४ व कक्ष अधिकारी, ल-९ यांनी त्यांच्या कार्यासनांशी संबंधित असलेली धोरणात्मक बाबींची सर्व प्रकरणे कक्ष अधिकारी, ज-१ यांच्याकडे तात्काळ वर्ग करावीत.

इ) " ज " गटातील शासकीय जमिनविषयक धोरणात्मक बाबी हाताळणा-या ज-१ व ज-१( अ) या कार्यासनांमधील विषय वाटपांसंबंधीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत.

०६. महसूल अधिका-यांच्या सेवाविषयक बाबींचा जलदगतीने निपटारा करता यावा यासाठी " ई-१ " या कार्यासनाचे विभाजन करुन " ई-१ (अ) " हे नवीन कार्यासन निर्माण करण्यात येत आहे. तसेच महसूल उपकक्षातील माहिती अधिकार अधिनियमाचे कामकाज, मा. लोक आयुक्त , मा. उपलोक आयुक्त यांच्याशी संबंधित शासन स्तरावरील व क्षेत्रीय स्तरावरील न्यायालयीन प्रकरणांचा समन्वय प्रभावीपणे होण्यासाठी आता " म-६" हे कार्यासन निर्माण करण्यात येत आहे. या दोन्ही कार्यासनांकडे सोपविण्यात आलेले विषय सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये दर्शविण्यात आले आहेत.

०७. दिनांक १ ऑगस्ट, २०१४ पासून ठाणे जिल्ह्याचे विभाजन करुन " पालघर " हा नवीन जिल्हा निर्माण करण्यात आला आहे. पालघर जिल्ह्याशी संबंधित जमीनविषयक सर्व कामकाज या आदेशाद्वारे ज-४ (अ) कार्यासनाकडे सोपविण्यात येत आहे.

०८. वरीलप्रमाणे पुनर्रचना केल्यानंतर महसूल उपकक्षातील सर्व कार्यासनांकडे सोपविण्यात आलेल्या विषयांबाबतची एकत्रित सुधारीत विषयसूची स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहे.

०९. पुनर्रचनेपूर्वीच्या ल-४ व ल-९ कार्यासनांमध्ये कार्यरत असलेले कार्यासन अधिकारी / सहायक/ लिपिक-टंकलेखक यांची अन्यत्र पदस्थापना करण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत.

१०. सर्व विभागीय आयुक्त, सर्व जिल्हाधिकारी, जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे, नोंदणी महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी महसूल उपकक्षातील कार्यासनांच्या पुनर्रचनेची नोंद घेऊन त्याप्रमाणे त्यांच्या अधिनस्त कार्यालयांना जरुर त्या सूचना द्याव्यात.

११. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२८१६०६१२८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Narayan Kale

Digitally signed by Madhav Narayan Kale
DN: CN = Madhav Narayan Kale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.08.28 17:22:02 +05'30'

**(माधव काळे)**
शासनाचे उप सचिव

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
४. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
५. मा.मुख्य सचिव महोदयांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
६. सर्व विभागीय आयुक्त.
७. सर्व जिल्हाधिकारी.
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, नवीन प्रशासकीय इमारत, पुणे.
९. नोंदणी महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.
११.सर्व सह सचिव/उप सचिव, महसूल व वन विभाग, ३२ वा मजला, सेंटर-१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई - ४०० ००५ / मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२.सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, ३२ वा मजला, सेंटर-१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई- ४०० ००५ / मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१३. ई कार्यासन ( नि.न./ गो.लि.) महसूल व वन विभाग, ३२ वा मजला, सेंटर-१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई - ४०० ००५.

परिशिष्ट- अ

| **ई-१ (अ) कार्यासनाकडे सोपाविण्यात आलेले विषय** | **म-६ कार्यासनाकडे सोपविण्यात आलेले विषय** |
|---|---|
| १. महसूल प्रशासकीय यंत्रणा धोरणात्मक बाबी आणि समन्वय | १. माहिती अधिकार अधिनियम,२००५ अंतर्गत प्राप्त होणाऱ्या अर्जांचा समन्वय. |
| २. उपजिल्हाधिकारी / अपर जिल्हाधिकारी यांच्या ज्येष्ठतासूच्या प्रसिध्द करणे. | २. मा. लोक आयुक्त व मा. उपलोक आयुक्तांशी संबंधित प्रकरणांचा समन्वय. |
| ३. उपजिल्हाधिकारी / अपर जिल्हाधिकारी यांचे स्थायीकरण. | ३. महसूल विभाग (खुद्द) व विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांशी संबंधित न्यायालयीन प्रकरणांचा समन्वय. |
| ४. अपर जिल्हाधिकारी / जिल्हाधिकारी यांच्यातील कामकाजाचे वाटप तसेच त्यांच्याकडे सुपूर्द केलेल्या अन्य प्रशासकीय विभागाशी संबंधित बाबी. | |
| ५. अपर जिल्हाधिकारी / जिल्हाधिकारी यांची विविध समित्यांवर अध्यक्ष / सदस्य म्हणून नियुक्ती करणे. | |
| ६. राज्य प्रशिक्षण धोरणाशी संबंधित बाबी. | |